ON

# MANA OR THE MIND

COMPOSED AND PUBLISHED

BY


HADEV MORESHVAR KUNTE B. A.

ACTING HEAD MASTER HIGH SCHOOL PUNA.



Bombay,

PRINTED AT THE "NIRNAYA SAGAR" PRESS.

1872.

*Price 8 Annas.*

# मन

नांवाची

ही कविता


## महादेव मोरेश्वर कुंटे, बि. ए.

पुना हैस्कुलचे आक्टिंग हेडमास्तर.


ह्यांनीं



रचून प्रसिद्ध केली.




मुंबईमध्यें:

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिली.

इसवी सन १८७२.


किमत आठ आणे.

# TO THE SPIRIT

Which leads man to "turn the soul upon it-
self" under the condition of infinity both of
time and of space and in relation to God,
who is the personal embodiment of all that
man conceives to be morally excellent and in-
tellectually transcendent, who is the proper
correlate to the human mind, and whose
contemplation only can fill it and satisfy it,

THIS SHORT POEM

IS DEDICATED.

---

# NOTICE.

The sale-proceeds of this book will be used
in aiding poor students in Poona.

# PREFACE.



I. I remember or I feel that a desire for ridiculing comes when the feeling of admiration is roused; that these two are allied, that these two are always excited by the same cause which, however, operates from different points; and that when-ever a school of poetry or of thought has been set up in a country, flippant minds have ridiculed it, strong minds have examined it, and unsophisticated minds have admired it. Whether superior or inferior, beautiful or ugly, successful or failing, it can not but do some good. When such is the case, it is good to lay before one's countrymen, truth whether scientific or poetical as far as it is known.

II. Adherents of the Advaita school of philosophy hold that the human mind is infinite, most powerful, yea, identical with God himself. Those of the Dvaita school hold that the human mind is finite, limited in its powers and is able only to contemplate and worship God. The points of view from which these schools look upon the human mind are different; their tenets are, however, based on a correct, though partial view of the powers of the human mind. Hence the investigation of the relation between their views on this subject will be interesting.

III. This short poem entitled "Mana" (the mind) seeks to determine and explain this relation. It indicates our ignorance of the essence of the human mind and attempts its analysis without inclining to the tenets either of the Advaita or Dvaita philosophy. It recognizes, however, the importance of faith, pure, exalted, and spiritual, as known to, and felt by, our Tukáráma and Chaitanya. By faith or Bhakti is meant that spiritualized and concentrated condition of attention which raises the human mind above itself and enables it to commune with Nature as created or creating, as governed or governing. Definite in its scope, it points out the dimensions of the internal world distinguishing the essential from the accidental. It represents the subjective as embodied in the objective. It describes different states of the human mind under a variety of circumstances and seeks to determine the sphere of action of different intellectual faculties and moral feelings. It ends with insisting on communion with Nature and Nature's God as the highest and purest enjoyment vouchsafed to man.

1st *May* 1872. M. M. K.

---

ज्या परमात्म्याचा आणि मनाचा नित्य सापेक्ष संबंध आहे, ज्याच्या ध्यानानें मात्र मन तृप्त होतें, जो अवर्ण्य गुणांचें अधिकरण आहे, ज्याचें मनन अनंत कालाच्या आणि देशाच्या संबंधानें मनुष्याच्या मनावर विलक्षण संस्कार करतें, त्या परमात्म्याला

ही कविता

## अर्पण केली आहे.

---

## सूचना.

या पुस्तकापासून जो फायदा होईल तो पुण्यांतील गरीब मुलांच्या उपयोगास लावण्यांत येईल.

॥ अनेक बुद्धीचे तरंग ॥
॥ क्षण क्षणा पालटती रंग ॥ १ ॥

तुकाराम.

# प्रस्तावना.



निंदा आणि स्तुति ह्या दोहींचें मूळ एकच आहे. " पिंडे पिंडे मतिर्भिन्ना. " जसी मति भिन्न, तसी कृतिहि भिन्न; पण जसा ज्याचा अधिकार, तसी त्याची मति. या स्थितीमुळें, ज्याचें मन निर्मळ, त्याला सत्य आवडतें. ज्याचें मन हलकें, त्याची निंदेकडे प्रवृत्ति. ज्याची बुद्धि शोधक, त्याची परीक्षा करण्याकडे प्रवृत्ति. कसेंही कां असेना, यथामति, यथाशक्ति, स्वदेशाची सेवा करणें हें भूषणच आहे.

या कवितेचें नांव " मन " असें ठेविलें आहे. हिजमध्यें जो विषय आहे त्याचें स्वरूपकथन खालीं लिहिल्याप्रमाणें:—

अंतर्गोल. मन हें नांव. अवधान. स्वनिवर्तन. अनुव्यवसाय. तत्वशोधाविषयीं मनाची प्रवृत्ति. शंका. अणिमादि अष्टविभूति आणि अंतर्मुखता. परमेश्वर आणि मन. विस्मयानंद. प्रार्थना. उपाधि आणि मन. तत्वज्ञाचें मन. अनुमति. धर्म आणि मन. कवीचें मन. कारस्थान्याचें मन. भाषा, कला, शास्त्रें—हा मनाचा बहिराकार. स्मृति. बुद्धि, सुखदु:ख, इच्छाद्वेष, प्रयत्न. शृंगार. वीर. करुणा. रौद्र. अद्भुत. हास्य. बीभत्स. भयानक. शांत. सायुज्य.

---

# मन.



अंतर्गोल.
(The inner world.)

देहांत ह्या चालक कोण आहे ?
अभ्यंतरीं कोण विचार वाहे ?
आहे कुठें कोण ? न थांग लागे.
तेजाळ तें निश्चित एक वागे. १

जिथें चालती रंग कैसे अनंत !
जिथें एकदा ग्रीष्म, येती वसंत ;
जिथें सर्व हें विश्व बिंबून राहे ;
असें कोण, तें काय, कोठून आहे ? २

स्मृति जिथें उठती, बहु सूचना,
मनन, कीं स्वनिवर्तन, कल्पना,
अनुमिति, प्रतिभा, प्रतिभावना,
अनुमति, प्रतिषेधन, तूलना. ३

जीं दर्शनें ह्या जगतांत होतीं,
जें त्यांस न्ह्याळून जुळून ओती,
सिद्धांत त्यांतून पुढें निघावा,
ज्याला असा स्वार्थ सदाहि ठावा. ४

हें व्याप्य, हें व्यापक, छंद ज्याला ;
उत्सर्ग किंवा अपवाद आला ;

जेथें असा खोल विचार रंगे,
तें कोण? तें काय? न शोध लागे. ५
जें स्वार्थ सोडून दया करी कीं;
व्हाया सुखी जें झटतें स्वलोकीं ;
संसार ज्याला अतिगोड लागे ;
ज्याच्यामधें तो परमार्थ वागे. ६
इच्छा जिथें नेत्र हणीत राहे;
जी सिद्ध व्हाया न सुमार पाहे.
जें कीर्ति व्हाया न थकेच, धांवे.
होतां कधीं त्रास उदंड कावे. ७
शृंगारवीरादि नवा रसांला
जें लुब्ध होतां करतें श्रमाला.
भोगी किती दुःख! गढून राही ;
जें भार मोठा समजून वाही. ८
ह्या मृत्युलोकीं भवचक्र चाले.
आहे किती ही गति? कोण बोले?
त्याच्यावरी कोण चढून नाचे?
तें कोण आहे ह्मणवे न वाचे. ९

मन—हें नांव. (The name—mind.)

आत्मा, तसी बुद्धि, अनेक नांवें,
चैतन्य कीं मानस. हें न ठावें.
विस्तार ज्याचा अतिथोर वाटे;
ज्याच्या स्वभावीं गुण फार मोटे; १०

मन असें म्हणतों तुजला तरी;
कवण जें स्मरतें मज अंतरीं.
स्फुर मना ! चल, गायन मांडतों;
तुज बघूनच तांडव नाचतों. ११

अवधान. (Attention.)

ह्या शक्ति एकंदर एक मार्गें
जातां पदार्थावर लक्ष लागे.
डोळे निराळे, पण दृष्टि एक.
लावी तसा हें मन एक रोंक. १२
एकाग्र होतें मन सर्व जेव्हां,
ह्या शक्ति साऱ्या मिळतात तेव्हां.
हें एक आहे मन. हें प्रमाण.
तें तेजसें सूक्ष्म विशाल जाण. १३

स्वनिवर्तन. (Abstraction.)

स्वनिवर्तन—एक गुणीं मन
सरळ कीं करतें अनुधावन.
अतितद्गुणचिंतन तें करी.
बहुत अन्य गुणांस न तें स्मरी. १४
हा वृक्ष आहे, बहु धर्म त्यांत.
उंचीहि, रुंदीहि, नसेच अंत.
उंची कसी ! हें मन मुख्य पाही.
लावी किती लक्ष! निमग्न राही. १५

अनुव्यवसाय. (Selfconsciousness.)

मी जाणतें हें मन शुद्ध जाणी.
भानांत भानें मन फार आणी.
ज्ञानांत हें ज्ञान, विचित्र जोड.
नाहीं जगीं या रचनेस तोड. १६

तत्वशोधाविषयीं मनाची प्रवृत्ति. (Essence and mind.)

पृथ्वीप्रदेशांत पदार्थ भारी.
नांवें कुणाला कळतात सारीं ?
त्यांच्यामधें केवळ तत्व नांदे;
ज्यानें खरें विश्व अनंत कोंदे. १७
जें जें दिसे, दर्शन त्या म्हणावें;
जें जें सुचे, त्यासहि ह्याच नांवें.
हीं दर्शनें रम्य अनंत होतीं.
शास्त्रज्ञ कार्यें म्हणतात तीं तीं. १८
कार्यास ह्या कारण मूळ आहे.
होतें पुढें कारण, कार्य कीं हें.
तें हें हि. हें तें हि. परंपरा ही.
हा मार्ग विश्वास भरून राही. १९
सर्वांत ह्या कारण मुख्य कोण ?
तें ब्रह्म, तें तत्व, असेंच जाण.
हें मुख्य जें तत्व, अचिंत्य कोणी,
ब्रह्मांड शोधून मनांत आणीं. २०
तत्वास शोधी मन नित्य भारी.
हिंडे स्वतां सृष्टि अनंत सारी.

हें तत्व आतां न मिळे कुणाला,
धांवे धराया मन नित्य ज्याला. २१
तें तत्व आहे अतिसूक्ष्म, वाटे.
तें जाड्य कीं मानस. बुद्धि खुंटे.
जें ब्रह्म जें तत्त्व जगत्त्रयाचें,
तें काय आहे ह्मणवे न वाचे. २२

शंका.
(Doubts.)

बहु विकल्प मनीं उठती पहा !
मन जडांत कसें वसतें ! अहा !
मन बने जड. कीं जड हें मन.
जग खरें दिसतें अथवा हि न. २३
जड तत्त्व खरें, मन कीं खरें.
जड मनीं, मन काय जडीं शिरे.
मन इंद्रिय-संगम हा कसा ?
कवण तो प्रतिबिंबित आरसा ? २४
सरळ दृष्टि किती बघण्या शके ?
परम सूक्ष्म किती बघतां थके ?
श्रवण हें घडतें न कळे कसें ?
रस असे कसलाहि ! कुठें वसे ? २५
आहे त्वचा, इंद्रिय सर्व अंगीं.
हें दुःख, हें सौख्य कळे प्रसंगीं.
हा द्रव्यसंयोग कसा मनाशीं ?
हा शोध हा ! मानसवेग नाशी. २६

निद्रा कसी? मृत्यु कसाहि आहे?
तेंव्हां कुठें सोज्वल जीव राहे?
निद्रेमधें स्वप्न तरी कसें हें?
स्वप्नीं मनीं कोण विचार वाहे? २७

येतां पुढें मृत्यु मरेल काय?
रे! कोण देहीं मग नित्य होय?
आहे पुनर्जन्म अनंत देहीं?
कीं स्वस्थ हा जीव पडून राही? २८

हें शून्य, माया, प्रकृति,—प्रकार
आहे कुणाचा? न कळे विचार.
हें चित्त, हा थोर जगत्पसारा.
अज्ञान किंवा भ्रम होय सारा? २९

बांधी जगा कोण? कुठेंहि आहे?
जो पापपुण्यें निवडून पाहे.
आहे कुणी. कीं जड सिद्ध चाले,
जें कीं क्रमें सिद्ध अनादि आलें. ३०

अणिमादि अष्टविभूति आणि अंतर्मुखता. (The powers of the mind, and turning it on itself.)

तुझा वेग मोटा. तुझी धांव मोटी.
तुझी सूक्ष्मता काय येईल पोटीं!
तुझे रंग सारे तुला मात्र ठावे.
तुझा थोर आकार कोठें न मावे. ३१

हीं इंद्रियें पंच तुला पहाती.
आणून कीं सर्व पदार्थ देती.

संयोग त्यांचा तुजला घडे कीं,
तेव्हां तुझी शक्ति जगा विलोकी. ३२
मनन फार घडे. मग हें कळे.
निरखितां उलटें, मन आकळे.
मनवनीं शिरतां मन सांपडे.
समजतां मन, शांतिसुखीं पडे. ३३
मनजळीं डुबतां लहरी उठे.
उसळतां सुखडोह पुढें फुटे.
मन विशाल हिमालय वाटतें.
कठिण मार्ग पुढें, मन हें भितें. ३४
स्वतांला स्वतां पाहशी थोर तूं कीं,
स्वतांला स्वतां जाणतां काय बाकी ?
किती अंतरीं थोर सौंदर्य, आहा !
जगीं नित्य नाहीं, मनीं नित्य पाहा. ३५
आतां जगीं ह्या जगमात्र आहे;
आतां मनीं विश्व अनंत राहे.
पूर्वीं घडे ओळखतेस तें तें,
होणार त्याचेंहि भविष्य होतें. ३६
जें जें दिसे, बंधन त्यास सीमा.
पाही तुझ्या कोण अहा! विरामा !
आकाश कीं सिंधु अनंत नाहीं.
नाहीं मनारे ! तुज अंत कांहीं. ३७
कळेना कुणाला, वळेना कुणाला,

हटेना कुणाला, जिती कोण त्याला?
मनाची मनाला कळेना त्वरा कीं.
कळाया स्वतां शुद्ध बिंबा विलोकीं. ३८

परमेश्वर आणि मन. (God and mind.)

हें धांवतें कीं मन फार वेगें.
सीमेस केव्हांहि कधीं न लागे.
आकाश पाताळ समान ज्याला,
ब्रह्मांड सारें तिळमात्र त्याला. ३९
जें जें जिथें उत्तम शुद्ध राहे,
त्या त्यास जाणून पुढेंच आहे.
जो जो दिसे शांत सुखप्रदेश,
व्यापून त्याला उरवी न लेश. ४०
जें जें दिसे थोर दयाळु कांहीं,
व्यापून त्या त्यास पुढेंच पाही.
जी जी दिसे निर्मळ सत्यखाणी.
ती ती पुढें सोज्वल मार्ग जाणी. ४१
जें जें असे न्याय्य विशुद्ध कोठें,
त्या त्या पुढें न्याय्य असेल वाटे.
जों जों दिसे विश्व खरें अपार,
तों तों पुढें धांव करी समोर. ४२
जें कल्पनेला धरतां न येई.
व्यापून त्या त्यास पुढेंच जाई.
जाणीव जें काय कुठेंहि आहे.

जाणून त्यालाहि न तृप्त राहे. ४३
जें शक्य किंवा न; शिरेच त्यांत.
न ग्राह्य ऐसी न दिसेच मात.
मागें किती काळ निघून गेला,
बाकी किती काळ उरून ठेला. ४४
व्यापून त्या, नित्य निरभ्र जें जें,
तें सर्व जाणी मन; शक्ति गाजे.
संबंध सापेक्ष मनास ज्याचा,
त्या शुद्ध बिंबावर भाव याचा. ४५
सकळ बाह्य अनंत जिथें थके.
मन तिथें तितकें धरण्या शके.
मनन उत्तम जे निवडी गुण,
गुणगणास परेश अशा म्हण. ४६
जो ह्या मनाला करणार तृप्त,
दृष्टी पडो कीं न; असोहि गुप्त.
ज्याची मना सांगड नित्य राहे,
ज्याच्याविना हें मन शांत नोहे. ४७
मन जिथें सगळे गुण मांडतें.
गुणनिधींत तिथें मन खेळतें.
निरखितां परमेश जगे मन;
जन तरी म्हणती जगजीवन. ४८
मनीं मूर्ति जी, ती पुढें स्वच्छ येती.
दिसों लागतां नेत्र संतुष्ट होती.

दिपों लागती नेत्र; तें तेज भारी.
दिसे सृष्टि ही तों नवीशीच सारी. ४९
उल्लास तेव्हां उठती मनांत,
तो देव जेव्हां दिसतो जगांत.
साक्षात् मनोरूप दिसून येतें,
जें चित्तवृत्तींस भरून जातें. ५०

विस्मयानंद. (The Sublime.)

हा मी उभा. हें मन. इंद्रियें हीं.
दृष्टीपुढें सृष्टि अनंत राही.
हा मी उभा. हें जग चाललेंहे.
माझ्यापुढें डोंगर, रान आहे. ५१
पाण्यास सीमा नच. सिंधु चाले.
हें वायुचें मंडल हें निघालें.
मोठे नदीप्रांत. अरण्य घोर.
आकाश माथ्यावर. विश्व थोर. ५२
तारांगणें थोर, न अंत त्यांना.
हीं थोर राष्ट्रें गगनांत नाना.
राष्ट्रावरी राष्ट्र अनंत माला.
सीमा नसे पुष्कळ विश्वगोला. ५३
हा मी उभा, कालहि वर्तमान.
गेला किती. होय अनंत मान.
येणार बाकी तितकाच कीं हा!
आयुष्य माझें क्षण काय! आहा! ५४

जों यंत्र पाहीं मग सूक्ष्मदर्शी,
दावी निराळें जग दिव्य अशीं,
बिंदूंत ह्या राष्ट्र अनंत लागे.
राष्ट्रांत ह्या जंतु अनंत वागे. ५५

हा जंतु सौख्यांत विचित्र रंगे,
हें सौख्य त्याचें निमिषांत भंगे.
मी क्षुद्र कोणी. गणना नसे कीं.
मी जंतु ऐसा. उपमा न बाकी. ५६

हा मी उभा. हें मन फार चाले.
ज्याच्यामधें विश्व अनंत ठेलें.
ग्रासून विश्वास उरेच बाकी.
ज्याची अशी सिद्ध अनंतता कीं. ५७

निरखितां जग मी अतिदीन हा.
जग अनंत खरें. अणु मी. अहा !
निरखितां मन. मी जणुं विश्वसा.
मन अनंत खरें. मग मी तसा. ५८

प्रार्थना.
(Prayer.)

हे शुद्ध बिंबा! जगदीश राया !
आलों तुला मी भजनीं नमाया.
देवा अरे धांव, जगन्निवासा.
पाण्याविना हा मरतोच मासा. ५९

हें सृष्टिसौंदर्य विचित्र फार.
आकाश पृथ्वी रमणीय थोर.

तारे किती सुंदर ! काय डौल !
शोभे किती सोज्वल भूमिगोल ! ६०
जैसें स्फुरे हें मन ह्या कुडींत.
चैतन्यरूपी स्फुरशी जगांत.
ही सृष्टि हा देहच, जीव तूं रे !
तूं चाळसी विश्व अनंत सारें. ६१
तो सूर्य, तो चंद्र, अनंत तारे.
चक्राप्रमाणें फिरतात सारे.
ज्याला जसा ओघ तसा निघाला.
स्वस्थान कोणीहि धरून ठेला. ६२
कोणी चकाके, रमणीय तेजें.
लाली कुणाची गगनीं विराजे.
ही माळ कीं निर्मळ थोर मोतीं,
तूं देवदेवा ! धरतोस हातीं. ६३
आकर्षणाचें जणुं सूत्र त्यांना,
हे गोल मोठे फिरतात नाना.
हें चांदणें. तो गगनीं निघाला.
हें गोड, हें सुंदर रूप ज्याला. ६४
ती पूर्व पाहा हि. सकाळ झाली.
ती लाल, ती सोज्वल मूर्ति आली.
हें तेज, हा जीव जगत्त्रयाचा.
वर्णील शोभा, मग काय वाचा ! ६५
लीला तुझी ही. परमेश्वरा रे !

विश्वस्वरूपा उमजीव सारें.
हे वृक्ष, हें रान. विचित्र डौल !
ही पृथ्वी. हा सुंदर काय गोल ! ६६
ह्या डोंगरीं थोर नदी निघाली !
कैसे अलंकार सुरेख घाली !
पाण्यामधें हे उठती तरंग.
त्याच्यामधें सुंदर काय रंग ! ६७
हा सिंधु चाले. उठतात लाटा.
हा वेग आला भरतीस मोटा.
कौशल्य देवा ! तुज हेंच साजे.
नामें तुझ्या पावन, विश्व गाजे. ६८
जवळ ये. मज रूप तुझें कळो.
भजन मी करतों मन तें मिळो.
सकळ बाह्य जसें रमवी मन.
मन मला रमवो. जगजीवन ! ६९
कसे रंग ह्याचे ? कसा वेग ह्याचा ?
कळो ह्या मला, देवराया ! मनाचा !
कळो जीव हा, प्राण हा, काय आहे ?
कृपा होय तेव्हां, मनीं देव राहे. ७०

उपाधि आणि मन. (Accident and mind.)

तत्वाकडे ओढ मनास ह्या कीं.
जो मुख्य हें निर्मळ तत्व झांकी;
ज्यानें कळेना मनचक्र काय;
ऐसा जगीं थोर उपाधि होय. ७१

सकल संशयरूप उपाधि हा;
भ्रम करी, दमवी मन. हें पहा.
सबळ निर्मळ सत्यच सांपडे,
मग उपाधि पळे भलतीकडे. ७२

हा नित्य किंवा न उपाधि, देवा!
तूं तत्व; तूं सत्य घडीव सेवा.
हा सत्य किंवा न, उपाधि नांदो.
देवा! मनीं रूप तुझेंच कोंदो. ७३

व्यामोह माजे. उठतात शंका.
तूं धांव देवा. मज तार रंका.
तूं तारशी दीन. जगांत डंका.
जें मागतों मी, मज दे. नको कां? ७४

माझ्या मनींचा भ्रम सर्व जावो.
देवा! तुझें बिंब मनांत येवो.
हा गर्व, ताठा मजला नको रे!
माझ्या मनीं रूप चढीव कोरें. ७५

खटपटींत पडे मन हें, मळे.
विपुळ मोहभरें मन कोसळे.
पळत सौख्य पुढें; मन मागुती.
मनन ज्यास घडे बनतो यती. ७६

गेला पळालाच उपाधि दूर.
आनंद वाहे. निघतात पूर.
व्यामोह त्यांतून धुवून गेला.

तो शुद्ध चित्तें सुखशांति प्याला. ७७
मग जगीं दिसती बहु मौज जी.
बघबघून तिला सुख तो भजी.
रमवितो मन तो जगतीं जरी.
नमळतां निवळे मन हें तरी. ७८

तत्वज्ञाचें मन.
(A philosopher's mind.)

तत्वज्ञ कोणी गढला विचारीं.
आली तसी सृष्टि मनांत सारी.
आहे प्रमेयांत प्रमाण काय ?
प्रत्यक्ष किंवा अनुमान होय ? ७९
तें शाब्द किंवा उपमान कैसें ?
हे चालती गूढ सुशोध ऐसे.
आहे प्रमाताच विचार कर्त्ता,
साहा पदार्थांत निमग्न होतां. ८०
हें द्रव्य, तैसा गुण काय आहे ?
होती क्रिया कोण विचार पाहे.
सामान्य तें काय ? विशेष कैचा ?
संबंध किंवा समवाय साचा ? ८१
आहे जलीं काय जलत्व शोधी.
पाही जलत्वीं जलतत्व बुद्धि.
तत्वीं जलाच्या परमाणु राहे.
तो नित्य, तो सिद्ध, अनादि आहे. ८२
आला विचारीं परमाणु जेव्हां.

त्याला जलाचे जलधर्म तेव्हां.
त्याच्यांत व्यावर्तक कोण एक ?
सृष्टींत ह्या धर्म खरे अनेक. ८३
यांचें कसें लक्षण, हीच चिंता,
द्यावें अशा नांव विशेष आतां.
हा धर्म तेथें, परमाणु जेथें.
सामान्य तें अन्य पहा हि एथें. ८४
अव्याप्ति ही थोर, निघे प्रसंगीं.
येती अतिव्याप्ति तसीच रंगीं.
जेथें मुळीं संभवसत्व नाहीं;
होतें कसें लक्षण, शोध पाही. ८५
सत्ताच सर्वोत्तम जाति आहे.
द्रव्यांत, कर्मांत, गुणांत राहे.
जी जाति खालील, परा म्हणावी.
हीच्याच खालीं अपरा गणावी. ८६
साधर्म्य, वैधर्म्य, विभागमूळ.
आहे विभागांत विचित्र पीळ.
ही व्याप्ति, ही व्यक्ति, कळेल जेव्हां,
सिद्धांतसंबंध दिसेल तेव्हां. ८७
सकलकारणनाममहागण.
समवायि, निमित्त, असें ह्मण.
असमवायि हि कारण हें तिजें.
बहु कार्य तिहींच मुळें शिजे. ८८

(परम सूक्ष्म कणाद मना गणी.
मन इंद्रिय आंत असे कुणी.
जड असे, त्रसरेणुच आकृति.
मन नांव समान. दुजी कृति.)
आत्म्यावरी ज्ञान अनंत राहे.
ज्ञानास ह्या तें मन मूळ आहे.
संयोग हें कारण, कार्य होतां,
हीं इंद्रियें पंच सहाय आतां. ८९
ज्ञानांत ह्या कीं उठती तरंग.
होती स्वभावें अनुमानरंग.
हें साध्य, हें साधन, पक्ष हा कीं.
हें मर्म, ही व्याप्ति अधीं विलोकी. ९०
होतां परामर्श घडेल कार्य.
शोधीं अशा मग्न कणाद आर्य.
चैतन्यचिंता बहु ज्यास लागे.
सिद्धांतरंगीं जन तोच गुंगे. ९१

अनुमति. (Conscience.)

मनीं शक्ति आहे पहा ! मुख्य कोणी,
खऱ्याला बऱ्याला स्वतां स्वच्छ जाणी.
जिथें सत्य आहे, तिथें तेज आणी.
त्यजी सर्व खोटें, खऱ्या नित्य वाणी. ९२
खवळली मग शक्ति असी जिथें,
धडकली जणुं आग खरी तिथें.

सकळ चित्त जणों जळलें अधीं.
कळत सत्य कुणी त्यजतां कुधी. ९३
गेलें कधीं सत्य कळून त्याला.
चित्तांत त्याच्या पडलाच घाला:
ऐसें अहा ! मीं न कधीं करावें.
चित्तें असें कीं बहु तप्त व्हावें. ९४
खातें किती हें मन! दुःख होतें.
केलें अधीं सर्व मनांत येतें.
झालें असें कर्महि दुष्ट हातें.
पीडा स्वतां चित्त करून घेतें. ९५
निद्रा पळाली, जग शून्य झालें.
चित्तांत तों चैन नसे; पळालें.
चित्तास ह्या त्रास विचित्र लागे.
हें योग्य किंवा न, मनांत वागे. ९६

धर्म आणि मन. (Religion and mind.)

धर्मज्ञ शास्त्रार्थ मनांत आणी.
हें पुण्य, हें पाप, विचार जाणी.
वेदोक्त तें पुण्यच. शेष पाप.
प्रामाण्यसिद्ध्यर्थ मनीं प्रताप. ९७
शास्त्रप्रमाणा मन मूळ आहे.
कीं पूर्ववत् निर्णय शेषवत्, हें
पाहून मांडी मन जों विधीला,
तों वेद किंवा मन; वाद आला. ९८

ज्ञानास आचार धरून राहे.
ज्ञानांत कीं पर्यवसान पाहे.
ज्ञानाविना हें मन शुद्ध नोहे.
आचार हें साधन मात्र आहे. ९९

ज्ञानास झाली मन. मुख्य वर्म.
कीं चित्तशुद्ध्यर्थ विशेष कर्म.
साधून कर्में, नर पुण्य साधो.
प्रामाण्य कर्मांत सुशील रांधो. १००

प्रत्यग् मनोवृत्ति विकार पाही.
जें जें मनीं, त्यांत मिळून राही.
संस्कार जो जो घडतो मनाला,
हें कर्म कीं कारण मुख्य त्याला. १०१

ही मांडणी सर्व जगांत चाले.
मागें असें शिष्ट करीत आले.
हें सत्य किंवा न, विचार पाहा.
आहे मनाला अधिकार कीं हा. १०२

शोधून सद्धर्म मना पहा रे.
स्वाधीन हें ज्ञान तुझ्याच सारें.
ठावा नसे जोंवर मार्ग अन्य.
तों जाण रे! तूं पहिलाच धन्य. १०३

कर्माविना तूं न कधींहि राहा.
संस्कारनाशें मन दुष्ट पाहा.
संस्कार हें साधन, साध्य शुद्धि.
जाणो पुढें तो परमेश बुद्धि. १०४

कवीचें मन. (A poet's mind.)

तो रामराजा, जग त्यास जाणी.
विख्यातिही सोज्वल काय आणी !
युद्धीं जरी हा कृतकार्य होतो.
कीर्तीस वाल्मीकिच मूळ हो! तो. १०५

किती अल्प राजे सुकीर्तीस आले;
कवी ज्यांस वर्णावया सिद्ध झाले.
किती थोर राजेहि लोपून गेले.
कथाग्रंथ कोणीच ज्यांचे न केले. १०६

जरी शौर्य, औदार्य आहे कुणाला.
तरी तो न कीर्तीस कां योग्य झाला ?
मनाचें असें थोर माहात्म्य आहे.
मिळे कीर्ति तेथें, जिथें सिद्ध राहे. १०७

धांवे पहा हें, मन थोर त्याचें;
तों रंग दावी, जग सर्व साचें.
हे कल्पनेचे भरतात पूर.
एकावरी एक, समीप, दूर. १०८

तीं रामसीता, हनुमान् हि तो कीं.
लंकेंत तो रावण दुष्ट लोकीं.
रानें, नद्या, डोंगर, दूर देश.
आले मनीं सर्व जगत्प्रदेश. १०९

मधुवनीं मग तो रचना करी.
कविविना न घडेच अशी खरी.
सकळ विश्व जणों दिसतें पुढें.

मन तसें रचतां, रमतां गढे. ११०
चित्रें अशीं रेखटलीं सुरेख.
त्या वाल्मिकीचीं अतिशक्ति देख.
रे! देव होता ऋषि तो खरा कीं.
ज्याचें फिरे तें मन ह्या त्रिलोकीं. १११
तो कल्पनामूर्ति स्वतांच ओती.
तेथें पुढें रंग अनंत येती.
वीरादि सारे पसरून जाती.
निर्माण होतात नव्याच जाती. ११२
सौंदर्य जें काय जगांत नाहीं.
आहे पुढेंसें कवि नित्य पाही.
जी मौज कोणा न मिळे कधींही;
पाणी स्वतां ती जणुं नित्य वाही. ११३
तंद्री मनाची कविमात्र जाणी.
जेव्हां मनीं विश्व अनंत आणी.
हा देह. हा मी. नच भान ज्याला.
पाही जगांतील अनंत लीला. ११४
अंतर्गोल दिसे कवीस मुखसा कीं पाहतां आरसा.
आहे ज्ञान कसें? प्रकारहि किती? शोधी, करी आरसा.
ज्ञानीं ज्ञान वसे दिसे नवलसें चित्तीं स्वतांच्या. अहा!
कैसे हे स्मृतिचे तरंग उठती, आश्चर्य होतें पहा! ११५
आहे दुःख कसें? कसें सुख असे? हें सर्व जाणी कवी.
इच्छा काय मनीं प्रकार करती, ह्या शक्तिला चाळवी.

आहे द्वेष कसा? कसा भ्रमवितो लोकांस जों पाहिलें,
तों तों शुद्ध मनें विचित्र मननें सृष्टींत ह्या तो झुले. ११६
चित्तीं आंत कसा प्रयत्न घडतो, जीवास जो त्रासवी.
कैसी आग सदा मनीं धडकती, हें सर्व पाही कवी.
आहे धर्म कसा, अधर्महि कसा, हें स्वच्छ ज्याला कळे.
ह्या वाल्मीकि कवीश्वरें मधुरसे काव्यार्थ ते जोडले. ११७

कारस्थान्याचें मन. (The mind of a politician.)

कारस्थानी गुंतला ह्या विचारीं—
कैसी हातीं सांपडे राज्यदोरी ?
कैसे वैरी नम्र येती घराला ?
सत्ता भारी आवडे ह्या जनाला. ११८
जरी शांत वाटे, मनीं त्रास फार.
जरी गोड बोले, मनीं पेंच थोर.
जनीं प्रीति दावी; मनीं राग ठेवी.
रची युक्ति कीं कीर्ति मोटी मिळावी. ११९
दिसे फार साधा, नसे त्यास डौल.
तरी भाषणीं, अंतरीं फार खोल.
जी जी घडामोड जनांत होती,
चाळी तिचें तो कळसूत्र हातीं. १२०
ह्या अंतरीं खोल विचार येती.
तों दूर जाती बहु चित्तवृत्ति.
द्वीपस्थ राजे करतात काय ?
मोडावया त्यास कसा उपाय ? १२१

आकाश जैसें ढग फार घेरी,
तों पालटे सुंदर सृष्टि सारी,
आकार सारे बदलून जाती,
एका क्षणीं रंग विचित्र होती. १२२

तेव्हां जरा वायु निवांत होतां,
ती चालती वीज भयाण आतां.
तों सांज होतां जग शून्य झालें.
मध्यें चकाकी गगनांत चाले. १२३

चित्तांत ऐसे उठती तरंग;
जें राज्यलोभांत सदाहि गुंग.
आकार त्याचा नच एक राहे.
वर्णावया कां मज शक्ति आहे? १२४

भाषा, कला, शास्त्रें, — हा मनाचा बहिराकार. (Language, science, arts, and poetry embody the mind.)

मनुष्य कैसा करतो प्रयत्न!
व्हावें ह्मणे तो मज सौख्यरत्न.
मोठ्या हवेल्या शहरांत बांधी.
तों शास्त्र, यंत्रें हि अवर्ण्य साधी. १२

अनंत शास्त्रें, न कळे गणाया.
तीं गूढ सारीं समजून घ्याया.
अनंत सिद्धांत, मतें अनंत.
अनंत नांवें. भ्रमलोंच त्यांत. १२६

जें जें दिसे, त्यास असेच नांव.

नांवांत एका बहु धर्मठेव.
हा धर्म साधी बहु चित्तवृत्ति.
चित्तास ह्या शोधवनीं प्रवृत्ति. १२७
प्रवृत्ति होतांच विचार येती.
कैसे किती ते गणना न होती.
एका विचारासच एक नांव.
ह्या नांवसिंधूस नसेच ठाव. १२८
अनंत भाषा भरल्या जगांत.
एकींत कीं शब्द पहा! अनंत.
शब्दावरी शब्दच ओघ चाले.
शब्दांतरीं खोल विचार डोले. १२९
चिंत्यास ह्या चिंतक तूं मना! कीं.
हे शब्द संकेत अनंत लोकीं.
शब्दाविना चिंतन, चिंत्य नाहीं.
हें शब्दरूपी मन तूंच पाहीं. १३०
जड कृत्रिम जें दिसतें मला.
मग असोत किती पुतळे, कला.
कविनिर्मितपुस्तकसंग्रह.
बहुनिबंध हि जे गणती ग्रह. १३१
रमणीय किती नगरें, घरें.
झळझळीत जिथें कठडे, तुरे.
बहुरूप असें घरतें, पहा!
अवतरे जणुं कीं मन हें. अहा! १३२

तूं मोड आतां पुतळा कुणी कीं.
हा ढीग. माती उरलीच बाकी.
कारागिराचें मन त्यांत होतें.
तो मोडतां हें मन दूर जातें. १३३

हा थोर वाडा. मजले पहा हे.
नक्षी कसी ! सुंदर रंग आहे.
चित्रें कशीं ! वेल्बुटांत डौल.
सौंदर्य पाडीच मनास भूल. १३४

वाड्यास ह्या ढासळतां ढिगारा.
सौंदर्य गेलें. उरल्यात गारा.
आकार गेला, मग तत्त्व गेलें.
कारागिराचें मन दूर झालें. १३५

आकार जे शाब्दिक कीं कलेचे,
ते दाविती रंग खरे मनाचे.
वाडा असो, शास्त्र असो हि, धर्म.
हें सर्व होतें, मन हेंच वर्म. १३६

जड सिद्ध पुढें जितकें दिसे.
सकळ ईश मनांत अधीं वसे.
मग ईश जसें स्वमनीं करी,
निवळ आकृति विश्व तसी धरी. १३७

अरण्य शोभा रमणीय साजे.
पाणी फिरे. वृक्ष किती विराजे !
वृक्षांत पक्षी. वननाद गाजे.
हे पाहतां हौस मनांत माजे. १३८

रे! वीज आतां पडली वनांत.
आकार सारा उलटे क्षणांत.
आकार गेला, मग काय झालें?
साकार चैतन्य फिरून गेलें. १३९

सकळ विश्व मनीं जणुं बिंदु हा.
पळ नको गणना करण्या. पहा!
मन किती? मन हें गणतां थके.
मन मनास न कीं धरण्या शके. १४०

चैतन्य हें ईशमनास नांव.
जें शुद्ध, तेजाल, सुखस्वभाव.
चैतन्यरूपा मन शुद्ध भेटे.
सायुज्य सानंद अखंड लोटे. १४१

स्मृति.
(Memory.)

बुद्धींत वृत्तींत उदंड भेद.
जें ज्ञान, ती बुद्धि, पदार्थवाद.
त्या वृत्ति, ज्यांना सुखदुःख ठावें.
व्यापार हे सर्व मनस्वभावें. १४२

प्रकारें प्रकारें मनीं ज्ञान होतें.
पुढें सौख्य कीं दुःख धावून येतें.
मनीं द्वेष इच्छा असा पाक होतो.
प्रयत्नप्रपंच प्रकाशे मनीं तो. १४३

ह्या शक्ति साऱ्या असती प्रसक्त.

मध्यें कधीं त्या वसतात गुप्त.
निद्रा जसी जागृति या शरीरा.
संस्कार ऐसाच मनास सारा. १४४
संस्कार ज्याचा, स्मृति तीच होती.
ज्ञानादि सौख्यादि असंख्य जाती.
इच्छा प्रयत्नादि मनांत येती.
कालांतरें भिन्न न रूप घेती. १४५
ऐसे पहा सर्व स्मृतिप्रकार.
तांडे स्मृतीचे निघतात फार.
जेव्हां स्मरे एक, दुजें हि आलें.
रंगावरी रंग मनांत चाले. १४६
स्मरे गंध जैसा, तसा वास भासे.
मनीं रंग जे जे पुढें ते उभेसे.
स्मृतीनेंच प्रत्यक्ष. आश्चर्य कीं हें.
स्मृतीची निघे धार; संबंध वाहे. १४७
स्मरे तेंच जें काय संबंधि आहे.
मनीं एक येतां दुजें सिद्ध राहे.
महापूर येतां निघे ओघ जैसा;
स्मृतीचा मनीं ओघ चालेच ऐसा. १४८
चित्तांत जेव्हां उठती तरंग,
एका ठिकाणींच विरुद्ध रंग.
शोकांत आनंद मिळे विचित्र.
तों राग मांडी विपरीत सत्र. १४९

वृत्तींत कीं वृत्ति पिळून राहे.
मी हा असे ही स्मृति मात्र आहे.
पाण्यास जैसा कढ फार येतो,
वृत्तींत तैसाच प्रकार होतो. १५०
स्मृतिमधें स्मृति ह्या लहरी जणूं.
पवनचक्र तिला हि कसें म्हणूं?
न मिळती उपमा, थकला कवी.
जग तुझी समता नच दाखवी. १५१

बुद्धि, सुखदुःख, इच्छाद्वेष, प्रयत्न. (Knowledge feelings and will.)

आहे मनीं बुद्धि तरंगपात्र.
मनांत चाले सुखदुःखसत्र.
इच्छा तसा द्वेष. तऱ्हा अनंत.
प्रयत्न हा चालक मुख्य त्यांत. १५२
धर्मा अधर्माहि अदृष्ट नांवें.
वर्णी जगख्यात कणाद. ठावें.
हीं पांच, संस्कार मिळून साहा.
आत्म्यावरी हे गुण सर्व पाहा. १५३
वर्णून मी बुद्धि निघे पुढें कीं.
वर्णीन जें काय असेल बाकी.
देखे जसी दृष्टि पदार्थ कोणी,
तों रूप त्याचें मन नीट जाणी. १५४
सौख्यादि होतो परिणाम जेव्हां,
इच्छा उठे, द्वेष मनांत तेव्हां.
इच्छेमुळें चित्त करी प्रयत्न.
प्रयत्न अभ्यंतर. बाह्य यत्न. १५५

संस्कार होतां, स्मृति शुद्ध होती.
स्वप्नादि साऱ्या बहु अन्य जाती.
शृंगारवीरादि रसप्रकार.
हे धुंडती केवळ सौख्यसार. १५६
यांना मनाचे म्हणणार धर्म.
पूर्वीं पहा सांगितलेंच वर्म.
वर्णीन मी मिश्रित बुद्धिरंग.
वृत्तींत जे कीं उठती तरंग. १५७

शृंगार.
(The beautiful and the amorous.)

हें स्थान रे! सुंदर कोण आहे ?
शोभा स्वयंभू रमणीय राहे.
पुष्पें किती रम्य! सुगंध चाले.
नामी किती झालर! रंग डोले. १५८
कारंजें हें. हें उडे रम्य पाणी.
लोकांमध्यें हौस, आरास आणी.
तेजाची तों कांति दाटे सभोंती.
सौंदर्याचे हे जणों पूर येती. १५९
हातांत वीणा बसली सुशोभा.
हें रूप कीं सोज्वल. दिव्य रंभा.
बोटें तिचीं तीं धरतात वीणा.
फांके किती कांति मनांत आणा. १६०
डोळे किती भव्य! कटाक्ष गोड.
चित्तास लावील सुरूप वेड.

वेणींत, भांगांत, अवर्ण्य डौल.
ती हास्य मुद्रा. खुलतात गाल. १६१
चोळीस उत्कृष्ट जरीकिनारी.
वर्णूं किती रूप ! सुरेख नारी.
गाण्यास लागे रममाण रूप.
तों पाझरे हें जणुं चित्त तूप. १६२

"मनांत झुरतें किती! मज सख्या कसा सोडशी!
उगीच करशी, अहा! कपट काय आतां मशीं.
दिलें सकळ मीं तुला मन. करूं नको राग.हा!
प्रसन्न तुज कीं करूं.मनन हेंच चित्तीं पहा. १६३
सदोदित मला तुझा बहुत छंद. ये ये प्रिया.
स्वरूप रुचतें तुझें. मदन तूं. तुझी मी प्रिया.
नसेच जगतामधें जन दुजा तुझ्यासारखा.
स्मरीत बसलें,अहा!गुण तुझे.मनीं तूं सखा. १६४
दडून बसशी मनीं. निवळ रूप बिंबे तिथें.
समोर दिसशी कधीं? जलद धांव सुज्ञा इथें.
खरोखर पुढें गड्या! रमत तूं उभा राहशी.
सुरेख बहु मूर्ति ही.मज सवें न कां बोलशी! १६५
तुझी अवयवप्रभा ! बहुत गोड तूं शोभशी !
अहा! सकळ नीट हें. पण मुका. नकां बोलशी?
रुसून पळशी मनीं.मज नको सख्या!भागवूं.
किती दिवस मी पुन:तुज मनीं असा वागवूं. १६६"

सख्या! मन तुझें खरें. पण नको बसूं ह्या मनीं.
स्वरूप नयना रुचे निरखितां तुला कामिनी.
मनांत वसशी जसा कढत लोहसा भासशी.
निवे नयन, शीत तूं. घडण ही तुझी रे! कशी? १६७
तुझ्या स्मृतिमुळें सख्या! सकल देह हा भाजतो.
तुझ्या रुचिर दर्शनें प्रकट चंद्र कीं भासतो.
गुणेंच विपरीतसा मज दिसे सखा कीं जसा.
कधीं सुखद चंद्र तूं; जणुं कधीं खरा सूर्यसा. १६८
जगीं सकळ ह्या मला सकळ तूंच हें भासतें.
पदार्थ दिसतात जे भ्रमविती तुझे भास ते.
अनंत भुवनें अहा! तुजविणें मला हीं फिकीं.
जगून करणार मी नच कळे पुढें काय कीं. १६९

वीर.
(Bravery and moral courage.)

रस कसा म्हणशी, मज सांग, हा.
बहु रणीं पडतें जनरक्त. हा !
मन जिथें रमतें, लय लागतां,
रस तिथें बनतोच खरा जिता. १७०
जन रणीं शिरतां, मन लागतें.
सवपु शौर्य निघे, रण माजतें.
जन जनास भिडे, गढले मन.
रण असें घडतें. मग धीर न. १७१
योद्धे निघाले लढणार शूर.
तर्वार हातीं रणरंगधीर.

मैदान पाहून तयार झाले.
जे युद्धरंगांत बुडून गेले. १७२
हें धैर्य आहे द्विविध, प्रमाण.
युद्धीं, मनीं, धैर्य असेंच जाण.
रे ! युद्ध होतां, रणधैर्य होतें,
जें अंतरींचें मतिधैर्य बा ! तें. १७३
दोहोंत ह्या हें मतिधैर्य थोर.
त्याकारणें दुःख जगांत फार.
जो वीर दावी रणधैर्य कोठें,
तो नांव पावे जगतांत मोठें. १७४
जे संत ते ते बळवंत योद्धे.
ते मांडती थोर मनांत युद्धें.
जो काम जिंकी, चढवी निशाण,
तो शूर. हें निश्चित आज जाण. १७५
जरा गोष्ट सांगावया जीव धांवे.
कशी गोष्ट ही सूक्ष्मचित्तें पहावें.
प्रतिज्ञा जनानें कुणी थोर केली:—
"खरें हेंच वाटे मला, भ्रांति गेली". १७६
राजा निघे, लोकहि अन्य वाटे.
राजास हें सत्य बरें न वाटे.
राज्याधिकारी जन ते मिळाले.
"रे! टाक हें सत्य, असें म्हणाले." १७७

भ्याला मनीं तो जन. धीर गेला.
कल्लोळ त्याच्या हृदयांत झाला.
चित्तांत मोठी मग आग लागे.
त्या भावना, वृत्तिहि, जीव गुंगे. १७८
मनीं युद्ध झालें. मनीं मोड झाला.
पुढें ब्रीद सोडी. नको तो म्हणाला.
प्रतिज्ञा बुडाली, तसा दीन भारी.
मनीं चैन नाहीं हि. पीडाच सारी. १७९
राजा म्हणे "पत्र लिहून दे रे!
आहे स्वतांचें मत रद्द सारें"
जो हात पत्रांत सही करी कीं,
तो दुष्ट; हा डाव मनांत घोकी. १८०
तो दुष्ट राजा मग सूड घ्याया,
लागे चिता घोर पुढें रचाया.
जों अग्निकुंडीं जन घालणार,
तेव्हां म्हणे तो जन, देव! तार. १८१
जों दुष्ट हातास चिढून न्हांळी.
तों आपला आपण हात जाळी.
राखी प्रतिज्ञा, मतिधैर्य दावी.
याची जनानी बहु कीर्ति गावी. १८२
भिईना कुणाला. खरें तेंच बोले.
किती होय पीडा, मनीं वीर डोले.

हजारों जरी शत्रु झाले समोर.
खरें तेंच बोले. हटेनाच वीर. १८३

हें धैर्य देवा! मज आज दे. गा!
हें शुद्ध, हें निस्पृह. चित्तरंगा!
चैतन्य जेथें सजतें सुवीर.
तें युद्ध देवा! रमणीय थोर. १८४

करुणा. (The piteous.)

जनमनीं करुणारस गोड हा.
विसरवीच अहंमति. हें पहा.
सहज दुःख घडे दुसऱ्यास जें.
निरखितां न सही, मन हें थिजे. १८५

वाडा सुशोभे. रमणीय चौक.
आहे मधें अंगण स्वच्छ एक.
वाडा रिकामा मज वाटला हा.
जों आंत गेलों. मन फाटलें. हा! १८६

सखी सुंदरी एक दृष्टी पडे कीं.
कधीं चित्र म्यां पाहिलें हें न लोकीं.
मुख म्लान आहे. न डोळ्यांत तेज.
कपाळांत काळोख. ही काय सांज. १८७

नसे ज्यांस वेणीफणी, केश होते.
खळ्या खोल गालीं जणों दुःख हो! तें.
शरीरीं भरे कंप हा! शक्ति गेली?

तिचीं कांकणें कोंपराशीं मिळालीं. १८८

फिरफिरून बघी घर आपलें.
सकळ शून्यच तें वन तापलें.
सहज जिन्नस जो तिज सांपडे.
बघबघून सखी बहु ती रडे. १८९

पोटीं उमाळे फुटतात जेव्हां,
हे शद्ब बोले मृदु फार तेव्हां.
"हा बाळ माझा ठकवून गेला.
केली मुला त्वां मज शोकशाला. १९०

पाटावरी तूं चल ये बसाया.
ये, घांस घे, हट्ट नको कराया.
हें आंगडें घाल. पळूं नको. रे!
चाळे किती हे! पळतेंच वारें." १९१

गडबडां उठली धरण्यास ती.
श्रम तिला घडले. दमली सती.
मग जसी बसली हळु खालतीं.
शिर पुढें गुडघ्यावर ठेविती. १९२

ते रोडके पाय; शरीर फोल.
तेव्हां स्वतांचा धरवे न तोल.
गेलें तिचें सर्व झिजून अंग.
चित्तास हें चित्र करील दंग. १९३

आकाश हें कोसळलें अपार.

पृथ्वींत ह्या अग्नि शिरे हि घोर.
पर्जन्य होतां प्रलय प्रसिद्ध.
ह्या पुत्रशोका उपमा न सिद्ध. १९४

रौद्र.
(Rage.)

मनीं शांत होतों. निघालों फिराया.
सवें मित्र चित्तास संतोषवाया.
पुढें मार्ग आला, कुणी एक आला.
मनीं चित्र हें बिंबतां रंग झाला. १९५

संतप्त मुद्रा, फिरतात डोळे.
चावीच ओठांस जनानिराळें.
जों तेज तोंडावरचें पळालें,
तों फार नाका फुगवून बोले. १९६

"त्यानें मला त्रास असा करावा!
माझ्यासवें द्वेष अरे! धरावा!
मी कोण ठाऊक नसेल. हाहा!
मी सूड घेईन, उगीच पाहा. १९७

माझ्यासवें गांठ पडून गेली.
काढीन मी वेडच. वेळ आली.
हा! काय मी आज मरून जाऊं?
हा प्राण जाया विष काय खाऊं?" १९८

असे शब्द हे काढले घोर जेथें,
किती अंतरीं पेटली आग तेथें!

मनाचा मना वेग तो आवरेना.
असा घोर संताप हा सोसवेना. १९९
तीं इंद्रियें पंच जळून गेलीं.
मनीं त्रास होतां मना पीळ घाली.
निघाला मराया तरी स्वस्थ नाहीं.
असा जीव कावून झालाच लाही. २००
खवळलें मन, धांदल मांडली.
गढुळलें, विटलें, नडलें मुळीं.
फुकट रौद्र जसा चिडवी मना.
उसळती, उडती मग भावना. २०१

अद्भुत. (The marvellous.)

प्रवासी निघालों. नदीतीर आला.
अतिश्रांत झालों. मनीं त्रास झाला.
नदीपात्र चाले. दिसे रंग काळा.
नदी काय घाली सुसौंदर्य माळा. २०२
काठीं बसे जों खडकावरी मी.
तों सौख्य झालें मज गोड नामी.
झाली असे सांज. विचित्र तेज.
पाण्यावरी तों लहरींत मौज. २०३
रुचिर, मंद, मनोहर वायु तो.
प्रिय, सुंदर दर्शन दावतो.
झुळझुळा जल तें हलतें जसें.
बहुरम्य नदीवन तों दिसे. २०४

आभाळ शोभे रमणीय तेजें.
त्याची किती कांति पडे ! विराजे !
झाडावरी तेज पडे विशाळ.
कांठावरी तीं रचतात माळ. २०५
पक्षी किती हे उडतात आतां !
झाडामधें ते बसतात जातां.
पाण्यामधें तों प्रतिबिंब त्यांचें
जेव्हां पडे. चित्र अवर्ण्य साचें. २०६
रंगावरी रंग पळांत झाले.
आतां गुलाबी गगनांत डोले.
आतां जरा मंदट रंग झाला.
तेव्हांच सारा बदलून गेला. २०७
आला पुढे कोमल अंधकार.
झाडांनदीचा बदले प्रकार.
छाया पडे. रात्र दिसे जराशी.
आनंद झाला हृदयांत राशी. २०८
अर्धी श्रांत होतों, पुढें सौख्य झालें.
स्वभावें स्वतां चित्त विश्रांत डोले.
पुढें गुंग होतां दिसेनाच कांहीं.
जणों झोप आली, मनीं शुद्धि नाहीं. २०९
तों स्वप्न आतां पडलें मला हें.
हा स्वर्ग, हा इंद्र समोर आहे.

शोभा किती सोज्वल! काय मौज.
सौंदर्यशोभा, रमणीय तेज. २१०
सूर्यावरी वास जराहि केला.
तेव्हां निघालों, मग चंद्र आला.
पाताळ पाहून तळीं निघालों.
वायूपुढें धावत फार आलों. २११
होऊन जागा बघतों पुढें तों.
वाहे नदी सुंदर. गर्क होतों.
हें स्वप्न. हें काय पळांत सर्व !
दृष्टी पडे सोज्वल रंग खर्व. २१२
स्वप्नीं दिसे अद्भुत, जाण त्याला.
पीळावरी पीळ अनंत लीला.
अंगांत अंगें, रचना विचित्र.
पाण्यावरी डोंगर. काय चित्र ! २१३
रे ! बिंदुमार्गें निघतात ढीग.
मुंगी गिळी डोंगर. काय रंग !
उड्डाण मारी जग सर्व जेव्हां,
याच्यापरी अद्भुत काय तेव्हां ? २१४
बीजांत कीं वृक्ष पडून राहे.
अग्नीवरी भूमि तवंग आहे.
शोभा हिऱ्याची, पण कोळसा कीं.
आश्चर्य हें सर्व विचित्र लोकीं. २१५

हास्य. (The humorous.)

ही मौज जों जों मन शुद्ध पाही.
तों हास्य रंगांत गढून राही.
पाहा ! पुढें नाटक काय चाले !
ही व्यक्ति, ही व्यक्तिच. सोंग आलें. २१६

संसाररंगीं जणुं नाच, मौज.
हे लोक पाहा! करतात साज.
होळी म्हणे, फार विशंक वागे.
मूर्खत्वमार्गी समजून रंगे. २१७

नाशी शरीरा अतिदुष्ट पाणी.
त्याला पितां सौख्य उदंड जाणी.
नाचे मजेनें, मन गुंग होतां;
याच्यापुढें हास्य उरे न आतां. २१८

बीभत्स. (Disgust.)

वेडांत बीभत्स रसप्रकार.
खरेंच उच्छृंखल सोंग घोर.
नाहीं मुळीं संगति. एक दंगा.
त्या मांडती मानसवृत्ति पिंगा. २१९

जों जों चढे जोर गढूळ रंगा.
तों भ्रष्ट होती नरचित्तगंगा.
तों धूळ लावी मग सर्व अंगा.
ध्यानांत आणा सहज प्रसंगा. २२०

हा घोर बीभत्स जनांत माजे.

तें अंतरीं फारच चित्त भाजे.
रंगावरी रंग अनंत ताजे.
बेसूर सारी मनतंत वाजे. २२१

भयानक. (The terrible.)

पुणें गांव आहे. नदीकांट आहे.
मढीं जाळती लोक. तें पात्र वाहे.
उभें उंच जोतें. वरी रान माजे.
जिथें रम्य वाडाच पूर्वी विराजे. १२२
ओसाड हें स्थान भयाण भारी.
माती हि, धोंडे, दिसतात गारी.
मध्यें जुना वृक्ष हि पिंपळाचा.
छाया नसे. पोकळ सर्व साचा. १२३
ही सांज. माजे बहु अंधकार.
चित्तीं उठे ओंगळ भीति घोर.
ही शून्य जागा जणुंकीं स्मशान.
मध्यें उठे शद्ब. टिके न भान. २२४
घुवड घोर तिथें बसलें असे.
मधमधूनच ओरडतें जसें,
मन भितें. मग देह तसा गळे.
सकळ निश्चय, धैर्य पुढें ढळे. २२५
बाजूस कोनांत लहान जागा.
पापी इथें त्रास करीत जागा.

नाहीं मुळीं झोंप, मनांत ल्हाही.
मी एकटा हें मन नीट पाही. २२६
"जगीं एकटा मी. कुणी मित्र नाहीं.
मला सौख्य आतां करीनाच कांहीं;"
ह्मणे तो असें, "रोग हा दुःख आणी."
भरे त्रासतां फार डोळ्यांत पाणी. २२७
पापी असा पापधुळींत लोळे.
ज्याच्या मनीं **कोप** उदंड घोळे.
ज्या श्रांति भारी. पण शांति नाहीं.
ज्या त्रासवी फार उगीच कांहीं. २२८
ज्याला कुटी **गर्व**, न तर्क चाले.
ज्या टोंचतो **दंभ** हणून भाले.
ज्या **लोभ** मारी चिरडून छाती.
चित्तावरी **मत्सर**, दोर हातीं. २२९
**कपट** ज्या फिरवी भलतीकडे.
सरळ वाट न कीं पचनीं पडे.
चडफडे बहु **चित्त** खुळें गुरू.
मनन हें, जनघात कसा करूं. २३०
पोटांत ज्याच्या **छळ** चोर वागे.
हा दुष्ट कर्मे करवी प्रसंगें.
आतां उठे **द्वेष** सहाय व्हाया.
हीं हीं पिशाच्यें जमती रमाया. २३१

तों डांखिणी तीन मनीं निघाल्या,
हातांत बर्च्या हलवीत आल्या.
**चिंता** स्वतांला चिरडून टाकी.
**हिंसा** करी त्रास उदंड लोकीं. २३२
खेळे मनीं घोर **कृतघ्नता** कीं.
हत्तीण जैसी रमती तटाकीं.
**अन्याय** तो मुख्य दिवाण जेथें.
जो दावतो मार्ग पसंत एथें. २१६
असा संग ज्याला, असा स्नेह ज्याला.
कधीं रोग होतां, दिसे मृत्यु त्याला.
धरी पाश हातीं, करी क्रूर डोळे.
शरीरांत पाणी कसेंसें झळाळे. २३३
रोगी तसा तो विघरून लोणी,
आहे पुढें क्रूर कृतांत जाणी.
पाही पुढें रौरव सुप्रचंड.
भ्याला मनीं कीं घडणार दंड. २३४
लाटेवरी लाट, समुद्र चाले.
पाणी नसे, अग्नि किती निघाले !
कुंडांत कुंडें उठतात पूर.
ती आग. आकांत. अनर्थ घोर. २३५
जरी आग चाले, दिसेनाच कांहीं.
तमाच्या दमानें मुळीं तेज नाहीं.

मधें नाचती तीं पिशाच्यें विशाल.
कसा वर्णवे क्रूर आकार चाल ? २३६
कडाडां किती एकमेकांस खाती.
किती दुष्ट पाप्यास जांचून घेती.
पुढें अग्निकुंडीं उभे तीक्ष्ण तीर.
छळाचे असे ते अनेक प्रकार. २३७
हें बिंबलें चित्र मनांत जेव्हां,
त्या पेटती चित्तकुवृत्ति तेव्हां.
ह्या कल्पना कीं स्वकुबुद्धिजन्य.
होतात ह्या रौरव. ईश धन्य. २३८

शांत. (The contemplative)

नदीतीर आहे. पुढें पात्र वाहे.
जळीं कांति पोहे. तटीं घाट राहे.
कशी शोभती शुभ्र वाळू, पहा कीं.
किती सूक्ष्म रेती ! मधें ही चकाकी. २३९
गंगाजलाच्या लहरींत मौज.
ह्या वाळुवंटीं मृदु सूर्यतेज.
दोन्हीकडे ह्या डगरींत रंग.
त्यांच्यावरी सोज्वल वृक्ष दंग. २४०
त्या बाजुला तो मठ स्वच्छ कोणी.
वाहे तिथें स्वच्छ समीप पाणी.
छाया सभोंवार सुरेख लागे.

ओटा तसें अंगण स्वच्छ मागें. २४१
स्थानांत ह्या तेज विचित्र कोंदे.
कोणी इथें संत सुखांत नांदे.
कायेमधें कांति भरे, तुडुंबे.
त्याचें किती तेज मनांत बिंबे. २४२
हा भक्तिसंगें रममाण होतो.
ही शोभली सुंदर फार तों तों.
ही **भक्ति** नारी सजली मनोज्ञ.
ती नम्र, ती शांत, सुशील, सुज्ञ. २४३
वाही इथें **सत्वच** नित्य पाणी.
आणी इथें **राजस** शुद्ध वाणी.
वाणी म्हणे पावनशील गाणीं.
देवास सारा मठ फार वाणी. २४४
तें **ज्ञान** आलें. मग **शांति** आली.
जोडा इथें हा फुगडीस घाली.
तेव्हां फुगे मानस. संत डोले.
**आनंद** कीं **सत्य** मिळून आले. २४५
हे सुज्ञ दोघेजण सिद्ध झाले.
सेवा कराया जलदी निघाले.
हें **सत्य** चित्तांत सड्यास घाली.
**आनंद** गंधें मग तो उगाळी. २४६
मग पुढें उठली तरुणी **दया**.

सुखजळें भिजली वरतां **नया**.
मृदु **दया** धरती वर तो करें.
मधुर चुंबन तो करण्या फिरे. २४७
धृति दिसे जणुं सुंदर ती **रमा**.
जवळ रम्य असे तरुणी **क्षमा**.
रमत बोलत त्या निघती पुढें.
बहुत सुंदर तेज मनीं चढे. २४८
तों **नम्रता** लाजत फार आली.
चित्तास ही कोमल माळ घाली.
तों **धर्म, उत्साह** उभे समोर.
सेवा कराया झटतात फार. २४९
तसी शुद्ध ती **भक्ति** जी थोर शक्ति.
पुढें संत देखे, रुचे ज्यांस मुक्ति.
जसा लोककल्याण चित्तांत घोकी.
तसा शुद्ध बिंबा पुढेंसें विलोकी. २५०

सायुज्य. (Communion with Nature and God.)

तों संत हें भोजन गोड मांडी.
ब्रह्मांड त्यानें गिळलीच उंडी.
हें विश्व, हें रूप पिऊन गेला.
आनंदरंगीं मग गुंग झाला. २५१
ह्या सृष्टिरूपीं मन तें बुडालें.
ब्रह्मांड सारें मन तेंच झालें.

पाही, तिथें हें मन शुद्ध आहे.
सृष्टींत ह्या अन्य मुळींच नोहे. २५१
चैतन्य तें निर्मळ बिंब आहे.
चैतन्य रूपांत गढून राहे.
शांतिस्वरूपीं मन सौख्य वाहे.
ह्या शांतिडोहीं मन सर्व पोहे. २५३
आकार सारा मन गर्भ ज्याला.
आतां खरें रूप धरून ठेला.
नाहीं कुठें भेद दिशेस काळा.
तो सच्चिदानंद फुटे उमाळा. २५४
ह्या दिव्य रंगीं मन मग्न होतां.
त्या शुद्ध बिंबीं गढलेंच आतां.
कीं बिंबरूपी बनलें स्वतां तें.
तो देव, हें चित्त मिळून जातें. २५५.

---